**प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना या योजनेची सन २०२३-२४ मध्ये अंमलबजावणी करण्याकरिता अनुसुचित जाती प्रवर्गाकरिता (केंद्र हिस्सा + राज्य हिस्सा) रु. २६०.०० लाख एवढा निधी वितरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- प्रअयो-२०२३/प्र.क्र.१८४/९-अे**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- २८ जुलै, २०२३

वाचा :- १) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.१२०/९-अे, दि. २३/१२/२०२०
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२/०४/२०२३
३) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. प्रअयो २०२३/प्र.क्र.१३१/९-अे, दि. ११/०५/२०२०२३
४) केंद्र शासनाचे इंग्रजी पत्र F.No. FM-११/८७/२०२२-FME, दि. २१.०६.२०२३
५) राज्य नोडल अधिकारी ((PMFME) तथा संचालक ( कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा.क्र. पीएमएफएमई/राज्य हि./२३-२४/२१७३५/२०२३, दि. ३०/०६/२०२३
६) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासण निर्णय क्र.बीजीटी-२०२३/प्र.क्र.६१/ अर्थसंकल्प (विधयो), दिनांक १७/०७/२०२३

**प्रस्तावना:-**

राज्यातील असंघटित अन्न प्रक्रिया क्षेत्रातील उद्योगांच्या समस्यांचे निराकरण करण्यासाठी केंद्र पुरस्कृत Prime Minister Scheme for Formalization of Micro Food Processing Enterprises (PMFME) या योजनेस केंद्र शासनाने मान्यता दिली आहे. या पार्श्वभूमीवर केंद्र शासन सहाय्यित प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (PMFME) ही योजना राज्यात सन २०२०-२१ पासून पुढील पाच वर्षासाठी म्हणजेच सन २०२४-२०२५ पर्यंत राबविण्यास वरील वाचा येथील दिनांक २३/१२/२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे.

सदरहू योजनेची सन २०२३-२०२४ मध्ये अंमलबजावणी करण्यासाठी केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा मिळून एकुण रुपये ४१९०७.७६ लाख एवढया रकमेच्या कार्यक्रमास उपरोक्त वाचा येथील क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. केंद्र शासनाने उक्त योजनेंतर्गत उपरोक्त वाचा येथील क्र. ४ च्या पत्रान्वये पहिल्या हप्त्याचा निधी राज्य शासनास वितरीत केला आहे. त्यास अनुलक्षून कृषि आयुक्तालयाने वाचा येथील क्र. ५ च्या पत्रान्वये निधी वितरणाचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. निधी सा. न्या. व वि. स. विभागाने उपरोक्त वाचा येथील क्र. ६ च्या शासन निर्णयान्वये अनुसूचित जाती प्रवर्गासाठी केंद्र हिस्सा (२४०१B३७५) रु. १८०.०० लाख व राज्य हिस्सा (२४०१B३८४) रु. ८०.०० लाख असा एकूण रु. २६०.०० लाख एवढा निधी कृषि विभागाकडे अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वर्ग केला आहे. सदरहू निधी राज्य नोडल एजन्सी ((PMFME) तथा आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१. केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजनेतंर्गत सन २०२३-२४ करिता अनुसूचित जाती प्रवर्गासाठी केंद्र हिस्सा रु. १८०.०० लाख व राज्य हिस्सा रु. ८०.०० लाख असा एकूण रु. २६०.०० लाख (रुपये दोन कोटी साठ लाख फक्त) एवढा निधी राज्य नोडल एजन्सी ((PMFME) तथा आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी खालील लेखाशिर्षातर्गत चालू वर्षी अर्थसंकल्पित केलेल्या तरतूदीतून खर्ची टाकावा.

| केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|
| मागणी क्र. एन-०३<br>२४०१- पीक संवर्धन<br>७८९- अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना<br>०१- अनुसूचित जाती घटकांतर्गत योजना<br>(०१)(२६) प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (केंद्र हिस्सा ६०%)<br>३३ अर्थसहाय्य (२४०१ B३७५) | मागणी क्र. एन-०३<br>२४०१- पीक संवर्धन<br>७८९- अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना<br>०१- अनुसूचित जाती घटकांतर्गत योजना<br>(०१)(२७) प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (राज्य हिस्सा ४०%)<br>३३ अर्थसहाय्य (२४०१ B३८४) |

३. सदर रक्कमेचे कोषागारातून आंहरण व संवितरण करण्याकरिता सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून नोडल एजन्सी, प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (PMFME) तथा आयुक्त (कृषी) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच जिल्हा स्तरावर कोषागारातून आंहरण व संवितरण करण्यासाठी जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखा अधिकारी यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर वितरीत निधी खर्च करताना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेल्या भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, कृषि व पदुम विभाग, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

५. विभाग प्रमुख/ नियंत्रक अधिकारी यांनी अनुसुचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

६. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार, नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १२/०४/२०२३ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

७. प्रस्तुत आदेश शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ नुसार विभागास प्रदान करण्यात आलेले अधिकार तसेच, शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक: बीजीटी-२०२३/प्र.क्र.६१/अर्थसंकल्प (विघयो), दिनांक १७ जुलै, २०२३ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७२८१८३७२३०८०१ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येते आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7f f397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836D F541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2023.07.28 18:39:24 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,राजभवन,मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई यांचे प्रधान सचिव.
३. मा.उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई यांचे सचिव.
४. मा.मंत्री (कृषि), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
५. मा.विरोधी पक्षनेते,महाराष्ट्र विधानपरिषद / विधानसभा, विधानमंडळ सचिवालय,मुंबई.४०००३२.
६. सर्व सन्माननीय विधानपरिषद/विधानसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य.
७. मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य, मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
८. अपर मुख्य सचिव ( नियोजन) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
९. अपर मुख्य सचिव ( वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१०. अ.मु.स. (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
११. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२. सचिव (पदुम),कृषि व पदुम विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१३. राज्य नोडल एजन्सी ((PMFME) तथा आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४. राज्य नोडल अधिकारी ( पीएमएफएमई) तथा संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१५. महालेखापाल-१/२ ( लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा ),मुंबई/नागपुर.
१६. सर्व विभागीय कृषी सह संचालक, महाराष्ट्र राज्य.
१७. सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी/तालुका कृषी अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१८. सहायक संचालक (लेखा-१),कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१९. महालेखापाल १/२, ( लेखा व अनुज्ञेयता)/लेखा परीक्षा),मुंबई /नागपूर.
२०. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
२१. संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई.
२२. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
२३. सह संचालक, लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई ४०० ०३२.
२४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
२५. माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२६. कक्ष अधिकारी (का.१४३१) नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई ४०० ०३२
२७. कक्ष अधिकारी (अर्थ-१३/व्यय-१)), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२८. कक्ष अधिकारी, अर्थसंकल्प(विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.३२
२९. कक्ष अधिकारी (२-अे), कृषी, कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३०. निवड नस्ती ९-अे.